**कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सरळसेवेने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.२७१/सेवा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ जुलै, २०२३

**संदर्भ :** १. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/ कार्या-१२, दि.१४.७.२०२१.
२. अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे क्र.सअअ(मुं)/ परिमंडळ/का.७/२४२१,दि.१२.०४.२०२३
३. अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे क्र.सअअ(मुं)/ परिमंडळ/का.७/२५०९,दि.१९.०४.२०२३
४. नियोजन विभाग, क्रमांक आजिका-२०२०/प्र.क्र.२९/का.१४१२,दि.०२.०३.२०२२ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय** :-

कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) राज्यस्तरीय पदभरती सन २०१९ मधील प्रतिक्षायादीतील रिक्त पदे भरण्याकरीता श्री.प्रविण रमेश हिवराळे व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे मूळ अर्ज क्र.३९२/२०२१ दाखल केला होता. सदर न्यायालयीन प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने दि.२०.९.२०२२ रोजी पारित केलेल्या न्यायनिर्णयानुसार सदर भरती प्रक्रियेतील रूजू न झाल्याने रिक्त राहिलेली १९ पदे प्रतिक्षायादीतील उमेदवारांमधून भरण्याबाबत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बंधकाम मंडळ, मुंबई यांनी संदर्भाधीन क्र.२ व ३ येथील दि.१२.०४.२०२३ व दि.१९.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये शिफारस केलेल्या व सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदावर ते रुजू होतील त्या दिनांकापासून, वेतनस्तर एस-१५ रुपये ४१,८००-१,३२,३०० या वेतनश्रेणीत, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या महसूल विभागातील रिक्त पदावर खालील अटी व शर्थीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सोबतच्या **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी महसूली विभागीय संरचना व विभागीय वाटप

नियमावली, २०२१ लागू राहील. सदर नियमावलीतील तरतूदीनुसार संबंधित उमेदवारांना त्यांच्या नावासमोर नमूद केल्यानुसार महसूली विभाग वाटप करून, वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागातील रिक्त पदावर सविस्तर पदस्थापना करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवारांनी पदस्थापनेच्या ठिकाणी विहीत मुदतीत रुजू होणे बंधनकारक आहे.सदर उमेदवारांना देण्यात आलेल्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

३. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर उमेदवारांनी संबंधीत मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व सेवेत रुजू व्हावे. अन्यथा, एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. कार्यालय प्रमुखांनी एक महिन्यानंतर रुजू होणाऱ्या उमेदवारास रुजू करुन घेवू नये.

४. सोबतच्या **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांची करण्यात आलेली नियुक्ती ही, सार्वजनिक बांधकाम विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर खालील विहित अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

१) एखाद्या उमेदवारास विहित कालावधीत अपरिहार्य, उचित कारणास्तव रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास त्या उमेदवारांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १० दिवसांच्या आत शासनास (अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई) यांना मुदतवाढीसाठी अर्ज सादर करावा. तद्नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. उचित कारणास्तव विहित कालावधीत मुदतवाढीसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांना मुदतवाढ देण्याचा/ नाकारण्याचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

२) जे उमेदवार या शासन निर्णय निर्गमित झालेल्या तारखेपासून **एक महिन्याच्या मुदतीच्या आत** नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही तर ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. तसेच या बाबतचा अहवाल संबंधीत मुख्य अभियंता/ संबंधीत अधीक्षक

अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी शासनाला दिनांक ०३.०८.२०२३ पर्यंत सादर करावा.

**३)** सोबतच्या परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची वैद्यकीय तपासणी त्यांना नियुक्ती दिलेल्या ठिकाणी तात्काळ करण्याबाबात त्यांच्या कार्यालय प्रमुखांनी दक्षता घ्यावी. तसेच त्यांचे वैद्यकीय तपासणी अहवाल नियुक्तीनंतर ६ महिन्याच्या आत करण्याच्या अटीच्या अधीन राहून त्यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. नियुक्तीच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत त्यांनी वैद्यकीय तपासणी अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखास सादर न केल्यास उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

**४)** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक चारित्र्य-२११७/ प्र.क्र.४८३/ २०१७/१६-अ, दिनांक २८/०८/२०१७ अन्वये सोबतच्या परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची चारत्र्य पडताळणी त्यांना नियुक्ती दिलेल्या ठिकाणी तात्काळ करण्याबाबात त्यांच्या कार्यालय प्रमुखांनी दक्षता घ्यावी. तसेच त्यांचे चारित्र्य पडताळणी अहवाल नियुक्तीनंतर ६ महिन्याच्या आत करण्याच्या अटीच्या अधीन राहून त्यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. नियुक्तीच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत त्यांनी चारित्र्य पडताळणी अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखास सादर न केल्यास उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

**५)** संबंधीत मुख्य अभियंता/संबंधीत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी सदर पदाच्या जाहीरातीत नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक व अन्य अटींची पुर्तता करणारी मूळ कागदपत्रे (वय, अधिवास, शैक्षणिक पात्रता, महिला आरक्षणानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, अनाथ प्रमाणपत्र इ.) तपासावीत.

**६)** सदर उमेदवारांची ज्येष्ठता ही सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.०६.२०२१ रोजीच्या शासन अधिसूचना अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, २०२१ मधील तरतुदीनुसार गुणवत्ता क्रमांकानुसार निश्चित करण्यात येईल. त्यामुळे

नियुक्तीच्या आदेशानुसार एक महिन्याच्या आत सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल व त्यांची ज्येष्ठता ते ज्या दिनांकास शासन सेवेत रुजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल.

७) मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांची प्रचलित नियमातील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित उमेदवारांची नियुक्ती करण्यात आलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार संबंधित उमेदवारांच्या मूळ सेवापुस्तकात नोंद घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी.

तसेच, मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर (अ.जा., अ.ज., वि.जा., भ.ज.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व.) नियुक्ती करण्यात आलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यास, त्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जात प्रमाणपत्राची वैधता, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयाने संबंधित मागसवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कागदपत्रे जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करावी. विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास संबंधित उमेदवारांच्या सेवा प्रचलित नियमानुसार समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

८) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय दिनांक २५.०५.२००१ मधील तरतुदीनुसार, खुला (महिला) आणि मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या उमेदवारांची, "महिलांसाठी उन्नत व प्रगत व्यक्ती गट (क्रिमीलेअर) यामध्ये मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र " (अलिकडचे/ नवीनतम मूळ नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र) ची सांक्षाकित प्रत तपासणीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडे पाठविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने खुला (महिला) व मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता

निवड झालेल्या महिला उमेदवारांचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र दोन प्रतीत शासनास पाठविण्याची कार्यवाही या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत सर्व मुख्य अभियंता/ सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी करावी. खुला (महिला) आणि मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांची नियुक्ती सदर तपासणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडून प्राप्त अहवालानुसार महिला उमेदवार अपात्र ठरत असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

**९)** उमेदवारांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. भाषा परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमाप्रमाणे रोखून ठेवण्यात येईल.

**१०)** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक ०७/०८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९/०३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून २ (दोन) वर्षांच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहित मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील. तसेच, ज्यांना या बाबतीत सूट अनुज्ञेय आहे त्यांची प्रकरणे प्रचलीत शासन निर्णयानुसार संबंधीत कार्यालय प्रमुखांनी तपासावीत.

**११)** शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदीनूसार दि.०१/११/२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांनी त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१/११/२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला

दि.०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नविन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२/०१/२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि.१८/०८/२००९ या परीपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल अशा शासकीय कर्मचाऱ्यास नविन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

**१२)** उमेदवारांनी कनिष्ठ अभियंता (स्थापत्य ) गट-ब (अराजपत्रित) या पदासाठी विहित केलेली व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**१३)** उमेदवारांनी व्यावसायिक परीक्षा विहीत कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. उमेदवारांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास तसेच, त्याचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अनुरुप / असमाधानकारक आढळल्यास, तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

**१४)** उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात यावे.

**१५)** सदर नियुक्ती, उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. उमेदवारांनी सादर केलेली प्रमाणपत्रे तसेच सांक्षाकन नमुन्यात नमूद केलेली माहिती, नियुक्तीनंतर खोटी अथवा बनावट आढळल्यास, सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**१६)** उमेदवारांच्या सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

**१७)** आवश्यकता भासल्यास उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरवेल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु,

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

**१८)** उमेदवार सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्याला शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/ ९२/८, दिनांक ०२/१२/१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे मूळ वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर असणार नाही.

**१९)** सोबतच्या परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३/०९/२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतुदीनुसार दिर्घ कालावधीचे व विदेशी प्रशिक्षणापूर्वी प्रशिक्षणार्थीला सक्षम प्राधिकाऱ्याबरोबर बंधपत्र लिहून द्यावे लागेल व त्याप्रमाणे नंतर प्रशिक्षणार्थी नोकरी सोडत असेल तर प्रशिक्षणावर खर्च झालेली रक्कम सदर प्रशिक्षणार्थीकडून वसूल करून संबंधित प्राधिकाऱ्याला शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल.

**२०)** उपरोक्त वसूली केल्याशिवाय प्रशिक्षणार्थींचा राजीनामा क्षेत्रिय स्तरावरुन स्विकारण्यात येऊ नये. त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक येथे रूजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे विहित बंधपत्र भरून सादर करणे बंधनकारक राहील.

२१) प्रशिक्षणादरम्यान सर्व प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

२२) उमेदवारांनी साक्षांकन नमुन्यात सादर केलेली माहिती नियुक्ती देण्यात आल्यानंतर असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्ती आदेश रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई करुन सदर उमेदवारांना शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

२३) तसेच, जे उमेदवार यापूर्वी अन्य विभागात अथवा या विभागात शासकीय सेवेत कार्यरत होते त्यांच्याबाबतीत ते ज्या विभागात/कार्यालयात कार्यरत होते त्या विभागाकडून/कार्यालयाकडून त्यांच्या विरूध्द कोणती विभागीय चौकशी सुरू होती किंवा प्रस्तावित आहे. याबाबतची माहिती प्राप्त करून घेण्याच्या अधिन राहून त्यांना तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. जर एखाद्या उमेदवारांविरूध्द त्यांनी यापूर्वी कार्यरत असलेल्या विभागात/कार्यालयात विभागीय चौकशी सुरू असल्याचे आढळून आल्यास नियुक्तीनंतरही सदर चौकशी सुरू राहील.

२४) उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी अथवा सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी याबाबत शासनास कळवावे.

२५) सोबतच्या परिशिष्ट-अ मधील उमेदवार सध्या केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील तर संबंधीत नियंत्रण अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रूजू करून घेता येणार नाही. तसेच सदर उमेदवारांची नियुक्ती ही त्यांचे केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेतील ना-चौकशी प्रमाणपत्र त्यांच्या संबंधीत कार्यालयाकडून प्राप्त होण्याच्या अधीन राहील.

५. **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांनी नियुक्तीच्या/पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता विशिष्ट ठिकाणी पदस्थापना / नियुक्ती मिळविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना

यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०४१७३४२६६३१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: CN = DATTATRAY VASANTRAO KHARKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC WORKS DEPARTMENT
Date: 2023.07.04 17:43:49 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल १/२, लेखापरिक्षा, महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४. मा. मंत्री (सां.बा.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/पुणे / नाशिक/ औरंगाबाद/नांदेड/अमरावती/नागपूर/राष्ट्रीय महामार्ग,सार्वजनिक बांधकाम विभाग,कोकण भवन,नवी मुंबई.
६. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे.
७. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
८. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.)/सचिव(रस्ते)/सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. कार्यासन [आस्थापना-१/आस्थापना-३/सेवा-२], सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.संबंधित उमेदवार (ई-मेलद्वारे) यांनी संबंधित मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, यांचे कार्यालयात हजर होणेकरीता संपर्क साधावा.
११.निवडनस्ती, सेवा-३.

****************

शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०२१/प्र.क्र.२७१/सेवा-३, दि.०४ /०७/२०२३ सोबतचे

परिशिष्ट- "अ"

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांनी शिफारस केलेल्या उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) पदावर नियुक्ती.

| अ.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | प्रवर्ग | महसुली विभाग वाटप | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १ | श्री.अतुल रामचंद्र ढोले | खुला | नागपूर | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.नागपूर अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,गडचिरोली अंतर्गत सा.बां.विभाग, आलापल्ली अंतर्गत सा.बां.उपविभाग,आलापल्ली. |
| २ | २ | श्री.भारत मच्छिंद्र आगळे | खुला | नाशिक | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.नाशिक अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,धुळे अंतर्गत सा.बां.विभाग,शहादा अंतर्गत सा.बां.उपविभाग, शहादा. |
| ३ | ३ | श्री.विनोद रामचंद्रजी मते | खुला | नागपूर | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.नागपूर अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,गडचिरोली अंतर्गत सा.बां.विभाग क्र.१, गडचिरोली अंतर्गत सा.बां.उपविभाग,वडसा. |
| ४ | ४ | श्री.सुरज श्रीकांत बावधनकर | खुला | कोकण-१ | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.कोकण अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,रत्नागिरी अंतर्गत सा.बां.विभाग रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, लांजा. |
| ५ | ५ | श्री.शुभम संजय धुडकेवार | खुला (खेळाडू) | औरंगाबाद | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.औरंगाबाद अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,उस्मानाबाद अंतर्गत सा.बां.विभाग,उस्मानाबाद अंतर्गत सा.बां.उपविभाग, कळंब |
| ६ | ६ | श्री.चेतन दिलीप भारंबे | इमाव | अमरावती | उपजिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय,वाशिम |
| ७ | ७ | श्री.अभिजीत विष्णू नंदुरकर | इमाव | अमरावती | उपजिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय,यवतमाळ. |
| ८ | ८ | श्री.शिशुपाल भिमराव लाडेकर | खुला | नागपूर | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.नागपूर अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,चंद्रपूर अंतर्गत सा.बां.विभाग, नागभिड अंतर्गत सा.बां.उपविभाग, सावली. |
| ९ | ९ | श्री.मोहित किशोर कनोजीया | आ.दु.घ. general against (इमाव) | नागपूर | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.नागपूर अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,गडचिरोली अंतर्गत विशेष प्रकल्प विभाग, सिरोंचा अंतर्गत विशेष प्रकल्प उपविभाग,सिरोंचा. |
| १० | १० | श्री.प्रविण रमेश हिवराळे | अजा | औरंगाबाद | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.औरंगाबाद अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,औरंगाबाद अंतर्गत सा.बां. पश्चिम विभाग,औरंगाबाद अंतर्गत सा.बां.उपविभाग, खुल्ताबाद. |
| ११ | ११ | श्री.पवन बलभीम कांबळे | अजा | औरंगाबाद | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.नांदेड अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,लातूर अंतर्गत सा.बां. विभाग क्र.२, लातूर अंतर्गत सा.बां.उपविभाग, जळकोट |
| १२ | १२ | श्रीम.प्रियंका उदेसिंग चव्हाण | खुला (महिला) | पुणे | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.पुणे अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,पुणे अंतर्गत मार्ग प्रकल्प विभाग क्र.१, पुणे अंतर्गत रिक्त पदी. |

| अ.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | प्रवर्ग | महसुली विभाग वाटप | सविस्तर पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १३ | १३ | श्रीम. डिंपल ईश्वर पाटील | खुला (महिला) | औरंगाबाद | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि.औरंगाबाद अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,औरंगाबाद अंतर्गत सा.बां. पश्चिम विभाग,औरंगाबाद अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.४,औरंगाबाद. |
| १४ | १४ | श्रीम. श्रुताली अनिल देसाई | खुला (महिला) | पुणे | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि,पुणे अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत सा.बां. (दक्षिण) विभाग,कोल्हापूर अंतर्गत सा.बां.उपविभाग,आजरा. |
| १५ | १५ | श्रीम. पुजा दत्तात्रय गुरुळे | खुला (महिला) | नाशिक | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि,नाशिक अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,नाशिक अंतर्गत सा.बां. (पूर्व) विभाग,नाशिक अंतर्गत सा.बां.उपविभाग,मनमाड. |
| १६ | १६ | श्रीम.दिपाली सुभाष मुसळे | खुला (महिला) | नाशिक | मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.वि,नाशिक अंतर्गत अ.अ.,सा.बां.मंडळ,नाशिक अंतर्गत आदिवासी सा.बां. विभाग,कळवण अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.२, सुरगाणा. |
| १७ | १७ | श्रीम. रश्मी राजू सोनार | आ.दु.घ. female against (इमाव) | नाशिक | मुख्य अभियंता,(रा.म.) सा.बां. विभाग, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गत अ.अ., राष्ट्रीय महामार्ग मंडळ, पुणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, रा.म.विभाग, धुळे अंतर्गत रा.म.उपविभाग क्र.४२, धुळे. |
| १८ | १८ | श्रीम.दिपाली गोविंद सुर्यवंशी | अजा (महिला) | कोकण-२ | मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि.मुंबई अंतर्गत किनारी अभियंता, सा.बां.मंडळ,बांद्रा, मुंबई अंतर्गत सहाय्यक पत्तन अभियंता, पत्तन उपविभाग, बांद्रा (मुंबई उपनगर) |
| १९ | १९ | श्री.सोमनाथ भुपेंद्र सातभाई | खुला (दिव्यांग-अस्थिव्यंग) | नाशिक | मुख्य अभियंता,(रा.म.) सा.बां. विभाग, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गत अ.अ., राष्ट्रीय महामार्ग मंडळ, पुणे अंतर्गत कार्यकारी अभियंता, रा.म.विभाग, धुळे अंतर्गत रा.म.उपविभाग साक्री. |

**********************************

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: CN = DATTATRAY VASANTRAO KHARKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC WORKS DEPARTMENT
Date: 2023.07.04 17:44:16 +05'30'